**एन.एस.ई.एल. आर्थिक गैरव्यवहार प्रकरणी स्वतंत्र सक्षम प्राधिकारी नेमण्याकरीता पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील पोलीस उप अधिक्षक / सहायक पोलीस आयुक्त संवर्गातील दोन पदे उपजिल्हाधिकारी या पदामध्ये रुपांतरीत करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-१०१७/प्र.क्र. ५४३/पोल-११**

गृह विभाग, दुसरा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
तारीख: ८ मे, २०१७

**वाचा :**

१) **गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक: एपीओ ३१०८/६९७/प्र.क्र.२८४/पोल-३, दि.०७ ऑगस्ट, २००८.**
२) **वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१५/प्र.क्र. ४१/अर्थ-१, दिनांक ०२ जून, २०१५.**

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधाचे संरक्षण अधिनियम १९९९ च्या कलम ५ अन्वये एन.एस.ई.एल. आर्थिक गैरव्यवहार प्रकरणी दोन उपजिल्हाधिकारी तथा सक्षम प्राधिकारी नियुक्त करण्यात आलेले आहेत. तथापि, या प्रकरणाची तातडी व गांभीर्य पाहता तसेच केंद्र सरकारच्या एन.एस.ई.एल. प्रकरणी गठित विशेष सचिव स्तरिय समितीने या प्रकरणाकरिता पूर्णवेळ स्वतंत्र सक्षम प्राधिकारी नियुक्त करण्याची शिफारस राज्य शासनास केली आहे. त्यानुषंगाने उपजिल्हाधिकारी तथा सक्षम प्राधिकारी या संवर्गाची दोन पदे निर्माण करण्याबाबतचा प्रस्ताव वित्त विभागास सादर केला आहे. तथापि, सदर पदनिर्मीतीस लागणारा कालावधी विचारात घेता व मा.केंद्रीय अर्थराज्यमंत्री, नवी दिल्ली येथे एन.एस.ई.एल.आर्थिक गैरव्यवहार प्रकरणाच्या आढावा बैठकीत राज्य शासनास या प्रकरणी १५ दिवसांत कार्यवाही करण्याच्या सूचना पाहता यानुषंगाने आवश्यक पदनिर्मिती प्रस्तावाच्या मान्यतेपर्यंत अंतरिम व्यवस्था म्हणून या प्रकरणी दोन स्वतंत्र पूर्णवेळ सक्षम प्राधिकारी नेमण्याकरिता उपजिल्हाधिकारी दर्जाची दोन पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुषंगाने शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवर उपरोक्त वाचा येथील क्र. १ च्या शासन निर्णयान्वये पोलीस प्रशि.क्रीडा व पोलीस कल्याण, कलीना करिता निर्माण करण्यात आलेल्या पोलीस उप अधिक्षक / सहायक पोलीस आयुक्त (वेतनश्रेणी रु. १५६००-३९१००, ग्रेड वेतन रु. ५४००/-) यांच्या ५ पदांपैकी सहायक पोलीस आयुक्त-४ व सहायक पोलीस आयुक्त-५ ही दोन पदे उपजिल्हाधिकारी (वेतनश्रेणी रु. १५६००-३९१००, ग्रेड वेतन रु. ५४००/-) या पदामध्ये तात्पुरत्या स्वरुपात रुपांतरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त प्रमाणे निर्माण करण्यात आलेल्या उपजिल्हाधिकाऱ्यांची दोन पदे महसुल विभागाच्या अधिपत्याखालील "उपजिल्हाधिकारी" संवर्गातून प्रतिनियुक्तीने भरण्यात येतील.

३. वरीलप्रमाणे रुपांतरीत करुन निर्मित केलेली सदरची उपजिल्हाधिकारी ही पदे पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवर राहतील. सदर आस्थापनेवर होणारा खर्च हा पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेसाठी ज्या लेखाशिर्षाखाली निधी मंजूर असेल त्या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वरीलप्रमाणे रुपांतरीत केलेल्या उपजिल्हाधिकारी या पदावर नियुक्त होणारे अधिकारी महाराष्ट्र ठेविदारांचे (वित्तीय संस्थामधील) हितसंबंधाचे संरक्षण अधिनियम, १९९९ च्या कलम ५ (१) अन्वये सक्षम प्राधिकारी म्हणुन काम पाहतील या सक्षम प्राधिकाऱ्यांकडे एन.एस.ई.एल. (N.S.E.L.) प्रकरणाचा कार्यभार राहील.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण -२०१५/प्र.क्र. ४१/अर्थ-१ दिनांक २ जून, २०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५०८१५५१२८७७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yuvraj B Ajetrao

Digitally signed by Yuvraj B Ajetrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68e6425b3accbc2689913c8cbb128d17b6b5411a5b0ad04137df39fe6ab84da7, cn=Yuvraj B Ajetrao
Date: 2017.05.08 15:51:30 +05'30'

**( युवराज ब. अजेटराव )**
**उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

२. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वने विभाग, मंत्रालय, मुंबई

३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
५. जिल्हाधिकारी, मुंबई शहर
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे, मुंबई
९. कार्यासन पोल-३, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवडनस्ती (पोल-११ कार्यासन).